महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण यांना अपारंपरिक ऊर्जा स्त्रोत कार्यक्रम (N.R.S.E) अंतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी अनुदान वितरित करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२२/प्र.क्र.०१/ ऊर्जा-७.**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**तारीख: १६ फेब्रुवारी, २०२२.**

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थस-२०२१/प्र. क्र. ४८/अर्थ-३, दिनांक ०६ एप्रिल, २०२१

२) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक अर्थस-२०२१/प्र. क्र. ४८/अर्थ-३, दिनांक २४ जुन, २०२१

३) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३,दि.२४/०६/२०२१.

४) महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण, पुणे यांचे क्रमांक:लेखा/बीपी-००६/एन.आर.एस.ई.प्लान २०२१-२२/ २१-२२/५४५९, दिनांक ३१.१२.२०२१ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), पुणे यांना सन २०११-२२ या आर्थिक वर्षाकरिता अपारंपरिक ऊर्जा स्त्रोत कार्यक्रम (N.R.S.E) अंतर्गत राबवावयाच्या योजनांसाठी "मागणी क्रमांक. के-६, मुख्य लेखाशीर्ष-२८१०-अपारंपारिक ऊर्जा साधने" याखाली रु.२५.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. सदर अर्थसंकल्पित तरतूद वितरीत करण्याबाबत महाऊर्जाने विनंती केली आहे. त्या अनुषंगाने वित्त विभागाने सदर तरतूदीमधून सन २०२१-२२ मध्ये अर्थसंकल्पित तरतूदीच्या ६० टक्केच्या मर्यादेत रु. १५.०० कोटी रुपये वितरीत करण्यास अनुमती दिली आहे. त्यानुषंगाने महाऊर्जा कार्यालयाच्या संदर्भाधिन क्र.४ येथील प्रस्तावाच्या अनुषंगाने अपारंपरिक ऊर्जा स्त्रोत कार्यक्रम (N.R.S.E.) अंतर्गत एकूण रू.१५.०० कोटी इतका निधी महाऊर्जास वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण, पुणे यांनी केलेल्या विनंतीनुसार, अपारंपरिक ऊर्जा स्त्रोत कार्यक्रम (N.R.S.E) अंतर्गत योजनांच्या/प्रस्तावांच्या अंमलबजावणीसाठी महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण, पुणे यांना त्यांचे प्रस्तावातील खालील प्रमाणे नमूद बाबी १) पवन संनियंत्रण कार्यक्रम/वारा मापन कार्यक्रमास रु. १.१० कोटी, २) ग्रामीण ऊर्जा कार्यक्रम / पारेषण विरहीत मागणी रु. ५०.०० कोटीपैकी रु. ३.८४४१ कोटी, ३) जैव ऊर्जा कार्यक्रम / ब्रिकेटींग प्रकल्प रु. ०.१९५९ कोटी, ४) ऊर्जा संवर्धन कार्यक्रमांतर्गत (i) सविस्तर ऊर्जा लेखा परिक्षण रु. ०.६० कोटी, (ii) SME Programme (Walk Through Energy Audit Prog.) रु. ०.१५ कोटी, (iii) राज्य स्तरीय ऊर्जा संवर्धन पारितोषिक कार्यक्रम रु. ०.४० कोटी, (iv) जन जागृती कार्यक्रम रु. ०.२५ कोटी व (v) ऊर्जा संवर्धन तंत्रज्ञान पथदर्शी प्रकल्प रु. ७.२५ कोटी, ५) जाहिरात फलक, प्रदर्शन, इलेक्ट्रोनिक, माध्यम, वर्तमान आणि नियतकालीन प्रसिध्दी, खाजगी प्रायोजकत्व, प्रदर्शन इ.

रु.१.२१ कोटी याप्रमाणे एकूण रु. याप्रमाणे एकूण रुपये १५,००,००,०००/- (रुपये पंधरा कोटी फक्त) इतके अनुदान महाऊर्जाला वितरित करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे. सदर योजनांचा अधिकचा तपशिल सदर शासन निर्णयासोबतच्या सहपत्रातील परिशिष्ट-"अ" मध्ये नमूद केला आहे.

२. सदर रक्कम अदा करण्यासाठी श्री.नारायण श्री. कराड, उप सचिव (ऊर्जा), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी व श्री.ना.रा.ढाणे, अवर सचिव, उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर निधी महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण, पुणे (Director General, Maharashtra Energy Development Agency, Pune) यांच्या नावे अदा करण्यात यावा. आदेशामध्ये विहित केलेल्या निकषांची पुर्तता झाल्यानंतर संबधीतांना निधी वितरण करण्याची जबाबदारी महासंचालक, महाऊर्जा यांची राहील, या अटिच्या अधिन राहून निधी वितरीत करण्यात येत आहे.

४. अपारंपरिक ऊर्जा स्त्रोत कार्यक्रम अंतर्गत परिशिष्ट क्र. "अ" मध्ये नमूद योजनेवरील खर्चाचा, उद्दिष्टे व प्रत्यक्ष साध्यता याबाबतच्या माहितीसह मासिक व त्रैमासिक अहवाल लगतच्या महिन्याच्या १० तारखेपर्यंत सादर करण्यात यावा.

५. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या निधीची रक्कम केवळ अपारंपरिक ऊर्जा स्त्रोत कार्यक्रम (N.R.S.E) अंतर्गत परिशिष्ट क्र. "अ" मध्ये नमूद योजनांच्या अंमलबजावणीसाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी खर्च करण्यात येईल याची खातरजमा करण्यात यावी. सदर निधी खर्च करण्यापूर्वी संबंधीत प्रकल्पांना सक्षम प्राधिकाऱ्यांकडून प्रत्यक्ष खर्चाच्या अनुषंगाने प्रशासकीय व तांत्रिक मान्यता घेण्यात यावी. विहित कालावधीत निधी कोणत्याही परिस्थितीत खर्च न होता महाऊर्जाकडे पडून राहिल्यास त्याची संबंधितांवर जबाबदार निश्चित करावी. मान्य व अनुज्ञेय काळात खर्च करण्याची जबाबदारी महासंचालक, महाऊर्जा यांची राहील. याबाबतचा त्रैमासिक अहवाल न चुकता सादर करण्याची जबाबदारी लेखाविषयक बाबी हाताळणाऱ्या सहाय्यक संचालक (लेखा) म्हणून कार्यभार पाहणाऱ्या अधिकाऱ्यावर टाकण्यात यावी.

६. सदर निधीच्या लेख्यासंबंधीची कागदपत्रे, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरणाने आवश्यक तेव्हा महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई यांच्याकडे तपासणीसाठी सादर करावीत.

७. याबाबतचा खर्च " मागणी क्रमांक के-६, २८१० अपारंपरिक ऊर्जा साधने,६० इतर, ८०० इतर खर्च, (००)(००)(०१) महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (कार्यक्रम), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) (२८१०००३४) " या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

८. अपारंपरिक ऊर्जा स्त्रोत कार्यक्रम (N.R.S.E) अंतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण यांना निधी वितरित करताना वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक

अर्थस-२०२१/प्र. क्र. ४८/अर्थ-३, दिनांक ०६ एप्रिल, २०२१ व दिनांक २४ जुन, २०२१ मधील अटींची पूर्तता होत आहे.

९. या लेखाशीर्षाखाली निधी वितरीत करण्यासाठी सादर करण्यात आलेल्या देयकाच्या अनुषंगाने प्रमाणित करण्यात येते की, या लेखाशीर्षाखाली कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही तसेच उपयोगिता प्रमाणपत्र प्रलंबित नाही. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाच्या मान्यतेने व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. २७/२०२२/व्यय-१६, दिनांक २८.०१.२०२२ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२२०२१६११२३२५६११० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANASAHEB RAJARAM DHANE

Digitally signed by NANASAHEB RAJARAM DHANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a71698611123263cde9d32423e9bb73044d91ed0cffad3b6267198ee5014159f, pseudonym=5DD23ACB82750B55FAC0D076A47198885E07A4B6, serialNumber=6C39E2858150DBDFCFE6CD25ED08ADF59F4D2FD8C1EDE1730735F604904BF3BB, cn=NANASAHEB RAJARAM DHANE
Date: 2022.02.16 11:25:36 +05'30'

**(ना. रा. ढाणे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण, औंध रोड, स्पायसर कॉलेज समोर, पशुसंवर्धन आयुक्तालया शेजारी, औंध, पुणे-४११ ००७.
२. महालेखापाल, महाराष्ट्र-१, ( लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), मुंबई- ४०० ००१
३. महालेखापाल, महाराष्ट्र-२, ( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), नागपूर
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७. आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८. अवर सचिव ( रोख/प्रशासन ), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,मंत्रालय,मुंबई.३२
९. अवर सचिव ( ऊर्जा-३), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. निवड नस्ती, ऊर्जा-७

## परिशिष्ट- “अ”

## शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांकः बीयुडी-२०२२/प्र.क्र.०१/ ऊर्जा-७, दिनांक:- १६ फेब्रुवारी, २०२२ सोबतचे सहपत्र

(रु लाख)

| अ क्र | योजनेतील बाब | संख्या | मंजूर रक्कम |
|---|---|---|---|
| १ | Infrastructure Development Programme<br>(Wind Monitoring Stations)<br>वारा मापन कार्यक्रम | ५ | १.१० |
| २ | Rural Energy Programme / Off Grid System<br>ग्रामीण ऊर्जा कार्यक्रम / पारेषण विरहीत | १०७७५ | ३.८४४१ |
| ३ | Bio Energy Programme-<br>जैव ऊर्जा कार्यक्रम / ब्रिकेटींग प्रकल्प | ६ | ०.१९५९ |
| ४ | Energy Conservation Programme-ऊर्जा संवर्धन कार्यक्रम<br>i) Save Energy Programme (Detail Energy / Audit Prog.)<br>सविस्तर ऊर्जा लेखा परिक्षण | २०० | ०.६० |
| | ii) SME Programme (Walk Through Energy Audit Prog.) | ५०० | ०.१५ |
| | iii) State Energy Conservation Awards<br>राज्य स्तरीय ऊर्जा संवर्धन पारितोषिक कार्यक्रम | १ | ०.४० |
| | iv) Public Awareness Programme जन जागृती कार्यक्रम | ५० | ०.२५ |
| | v) Energy Conservation measures in Govt. / Semi Govt. Office Build.<br>ऊर्जा संवर्धन तंत्रज्ञान पथदर्शी प्रकल्प | ३० | ७.२५ |
| ५ | Public awareness and Education Programme<br>जन जागृती व प्रशिक्षण कार्यक्रम<br>i) Publicity through outdoor, indoor, electronic, print media, Sponsorship, exhibition etc.<br>जाहिरात फलक, प्रदर्शन, इलेक्ट्रोनिक, माध्यम, वर्तमान आणि नियतकालीन प्रसिध्दी, खाजगी प्रायोजकत्व, प्रदर्शन इ. | - | १.२१ |
| | एकूण | | **१५.००** |